**भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची-ड, प्रकरण-८, कराधान नियम ३९, दिनांक १५.०६.२०१८ च्या देयकांद्वारे दिलेले वसुली नोटीस / आदेश व दिनांक ३०.०८.२०१८ रोजीचे कराधान नियम ४२ अन्वये दिलेले जप्ती आदेश निलंबित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- भिनिम-२०१८/प्र.क्र.७७/नवि-२३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- ११ फेब्रुवारी, २०१९

**संदर्भ :-**

(१) मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक २९.११.२०१८ रोजीच्या बैठकीत झालेला निर्णय.

(२) भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची-ड, प्रकरण-८, कराधान नियम ३९, दिनांक १५.०६.२०१८ च्या देयकांद्वारे दिलेली वसुली नोटीस व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची-ड, प्रकरण-८, कराधान नियम ४२ च्या तरतुदीनुसार जंगम/स्थावर मालमत्तेची अटकावणी करून जप्तीची कारवाई करणे संदर्भातील दिनांक ३०.०८.२०१८ चे आदेश.

**प्रस्तावना :** -

दिनांक २९.११.२०१८ च्या मंत्रिमंडळ बैठकीत भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांनी महावितरण कंपनीची फ्रेंचायझी मे.टोरेन्ट पॉवर कंपनीवर वितरण रोहित्र, एल.टी. पोल, एच.टी. पोल, भुमीगत वाहिन्या यावर आकारलेला रु.२८५.०८ कोटी (२००७-०८ ते २०१८-१९ पर्यंतचा-मुळ रक्कम ७८.३८ कोटी, व्याज रु.२१३.६७ कोटी) मालमत्ता कर व भुईभाडे भरण्याबाबतची नोटीस रद्दबातल अथवा निरर्ह करण्यास मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे.

सदर प्रकरणाची पार्श्वभुमी खालील प्रमाणे आहे:-

- भिवंडी-निजामपुर शहर महानगरपालिकेची स्थापना दिनांक ०६.१२.२००१ मध्ये झाली आहे.
- महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी व मे. टोरेन्ट पॉवर कंपनी यांचेतील करारानुसार महानगरपालिका क्षेत्रात मे.टोरेन्ट पॉवर कंपनी यांचेमार्फत दिनांक २६.०१.२००७ पासून विद्युत वितरण करण्यात येते. याकरिता महाराष्ट्र विद्युत कंपनी यांचेकडील भिवंडी-निजामपूर शहर क्षेत्रातील वितरण व्यवस्था, ज्यात इमारती, पोल, ट्रान्सफॉर्मर, इ. मे.टोरेन्ट पॉवर कंपनीस वापरण्यासाठी उपलब्ध केले.
- भिवंडी महानगरपालिकेने मालमत्ता कर व भूईभाडे यापोटी मे.टोरेन्ट पॉवर कंपनी यांचेवर दोन बाबींवर कर आकारणी केली आहे.
    i. विद्युत व्यवस्थेतील इमारती उदा. कार्यालय
    ii. वितरण व्यवस्थेतील पायाभुत उपकरणे. उदा. पोल, ट्रान्सफॉर्मर, भुमिगत केबल, इ. ज्या जागी आहेत त्या जागा.

- यापैकी मे.टोरेन्ट पॉवर कंपनी इमारतींवरील मालमत्ता कर भरत आहेत.
- तथापि, वितरण व्यवस्थेतील पायाभुत उपकरणे ज्या जागेवर आहेत, त्यावरील मालमत्ता कर व भुईभाडे आकारण्यास मे.टोरेन्ट पॉवर कंपनी व भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांच्यात मतभेद निर्माण झाले आहेत. भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेने मे.टोरेन्ट पॉवर कंपनी यांचेकडे सन २००७-०८ ते सन २०१६-१७ या कालावधीतील वितरण व्यवस्थेतील पायाभुत उपकरणे ज्या जागेवर आहेत त्या जागेवरील मालमत्ता कर व भुईभाडे पोटी रु.५९,१९,१९,३५० व त्यावरील दंडनिय व्याजापोटी रु.११७,३१,६४,२६६ या प्रमाणे रु.१७६.५० कोटी इतक्या रकमेची वसुली नोटीस दिनांक ३१.०१.२०१७ रोजी दिली.

  परंतु, विहित कालावधीत भरणा न केल्यामुळे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम अनुसूची-ड, प्रकरण-८, नियम-४२ नुसार दिनांक १६.०२.२०१७ रोजी भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांनी मे.टोरेन्ट पॉवर कंपनीस जप्ती / अटकावणीची नोटीस दिली व नोटीस कालावधी संपल्यानंतर दिनांक ०७.०३.२०१७ रोजी आयुक्त, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांनी टोरेन्ट पॉवर कंपनीच्या ताब्यात असलेल्या मालमत्तेची अटकावणी केली.
- मे.टोरेन्ट पॉवर कंपनीने दिनांक ०८.०३.२०१७ च्या पत्रान्वये भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेने मे.टोरेन्ट पॉवर कंपनीविरुध्द अटकावणीची कारवाई केल्याने भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका क्षेत्रातील रहिवाशांना देण्यात येणाऱ्या विद्युत सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नसल्याचे प्रतिपादन केले व शासनास हस्तक्षेप करण्याची विनंती केली.
- दिनांक १०.०३.२०१७ रोजी भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका क्षेत्रातील ग्राहकांना पुरविण्यात येणाऱ्या सेवेमध्ये खंड पडू नये या करीता आयुक्त, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांनी मालमत्ता कर व जमिन भाडे वसुल करणेकरीता मे.टोरेन्ट पॉवर कंपनी विरुध्द केलेल्या अटकावणीच्या कारवाईस सात दिवसांकरीता शासनाने स्थगिती दिली.
- भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची-ड, प्रकरण-८, कराधान नियम ३९, दिनांक १५.०६.२०१८ च्या देयक क्र.००१ ते ००४ द्वारे सन २०१८-२०१९ करीता भुईभाडे व मालमत्ता करापोटी (चालू मागणी व थकबाकी) रु.७१,३७,७२,९१२ व दंडनीय व्याजापोटी रू.२१३,६६,९९,४०० अशी एकूण रु.२८५,०४,७२,३१२ इतक्या रकमेचा भरणा करणेकरीता मे.टोरेन्ट पॉवर कंपनी यांना नोटीस दिली आहे. तसेच उक्त रकमेचा भरण न केल्याने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची-ड, प्रकरण-८, कराधान नियम ४२ च्या तरतुदीनुसार जंगम/स्थावर मालमत्तेची अटकावणी करून जप्तीची कारवाई करणे संदर्भात दिनांक ३०.०८.२०१८ रोजी मे.टोरेन्ट पॉवर कंपनी यांचे विरुध्द जप्ती आदेश बजावले.
- शासकीय विद्युत कंपन्यांना तसेच त्यांच्या फ्रेंचाइझींना त्यांचेकडून उभारण्यात येणाऱ्या विद्युत वितरण पायाभुत सुविधांसाठी (उपरी वाहिनी, भुमिगत वाहिनी, वितरण रोहित्र, विद्युत खांब, विद्युत मनोरे, पारेषण वाहिन्या, इ.) ग्रामपंचायत, नगरपालिका व महानगरपालिका यांचेकडून कोणतीही कर आकारणी करण्यात येऊ नये याबाबत ऊर्जा

विभागाने मंत्रिमंडळ निर्णय अपेक्षिला व याबाबत मंत्रिमंडळाने दिनांक २९.११.२०१८ च्या बैठकीत खालीलप्रमाणे निर्णय घेतला :-

"भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांनी महावितरण कंपनीची फ्रेंचाइझी मेसर्स टोरेन्ट पॉवर कंपनीवर वितरण रोहित्र, एल.टी. पोल, एच.टी. पोल, भुमीगत वाहिन्या यावर आकारलेला रु. २८५.०५ कोटी (२००७-०८ ते २०१८-१९ पर्यंतची मुळ रक्कम रु.७१.३८ कोटी, व्याज रु.२१३.६७ कोटी) **मालमत्ता कर (चालु मागणी व थकबाकी) यासह भुईभाडे** भरण्याबाबतची नोटीस रद्दबातल किंवा निरर्ह करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्याकरीता नगर विकास विभागाकडून याबाबत विशेष अधिसूचना निर्गमित करण्यास मान्यता देण्यात यावी. तसेच यापुढे वीज वितरण प्रणालीच्या विद्युत पायाभुत सुविधांवर कर आकारणी करण्यात येऊ नये याकरीता महाराष्ट्र महानगरपालिका अधिनिमय, १९४९ मध्ये आवश्यक ती सुधारणा नगर विकास विभागाकडून करण्यास मान्यता देण्यात यावी."

- भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका यांनी महावितरण कंपनीची फ्रेंचायझी मे.टोरेन्ट पॉवर कंपनीवर वितरण रोहित्र, एल.टी. पोल, एच.टी. पोल, भुमीगत वाहिन्या यावर आकारलेला रु.२८५.०८ कोटी (२००७-०८ ते २०१८-१९ पर्यंतचा-मुळ रक्कम रु.७८.३८ कोटी, व्याज रु.२१३.६७ कोटी) मालमत्ता कर व भुईभाडे भरण्याबाबतची नोटीस रद्दबातल अथवा निरर्ह करण्यास मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे.
- "वीज निर्मिती"ला या क्षेत्रात पायाभूत सुविधांचा दर्जा (infrastructure status) प्राप्त आहे. वीजेची निर्मिती व वितरण या करीता येणाऱ्या खर्चाची वसुली अप्रत्यक्षरित्या ग्राहकांकडून होत असते. यामुळे मे.टोरेन्ट पॉवर कंपनी यांच्या वीज वितरण व्यवस्थेवर मालमत्ता कर व भुईभाडे आकारल्यास त्याचा बोजा अंतिमत: ग्राहकांवर पडणार आहे व यामुळे समाजातील सर्व घटकास वीज वापरणे अधिक खर्चीक होणार आहे.
- यास्तव, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेने सन २००७-०८ ते सन २०१८-१९ या कालावधीतील वीज वितरण व्यवस्थेतील पायाभुत उपकरणे ज्या जागेवर आहेत त्या जागेवरील भुईभाडे व मालमत्ता करापोटी एकूण रु.२८५,०४,७२,३१२ इतक्या रकमेची वसुली नोटीसद्वारे मे.टोरेन्ट पॉवर कंपनी यांना उक्त रक्कम जमा करण्यास दिलेला आदेश अंतिमत: व्यापक लोकहिताविरुध्द असल्याचे निदर्शनास येते.
- महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ अंतर्गत महापालिकेच्या किंवा इतर कोणत्याही प्राधिकाऱ्याच्या कोणत्याही ठरावाचे अथवा आदेशांचे कार्यान्वयन व्यापक लोकहिताच्या विरुध्द असल्याचे राज्य शासनाचे मत झाल्यास सदर आदेशाचे कार्यान्वयन रद्द करण्याचे अधिकार राज्य शासनास प्राप्त आहेत. परंतु, तत्पुर्वी सदर आदेश निलंबित करून महानगरपालिकेस उक्त आदेशाविरुध्द राज्य शासनाकडे ३० दिवसांच्या कालावधीत अभिवेदन सादर करण्याची तरतुद आहे. सदर अभिवेदन विचारात घेऊन राज्य शासनाच्या मते न्याय्य किंवा इष्ट असेल त्याप्रमाणे आदेश रद्द, फेरबदल अथवा कायम करता येईल.

मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक २९.११.२०१८ च्या बैठकीतील निर्णय तसेच भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेचे दिनांक ३०.०८.२०१८ चे वसुली आदेश व्यापक लोकहिताविरुध्द असल्याचे विचारात घेता, शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय:-**

भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची-ड, प्रकरण-८, कराधान नियम ३९ च्या तरतुदीनुसार सन २००७-०८ ते सन २०१८-१९ या कालावधीतील वीज वितरण व्यवस्थेतील पायाभुत उपकरणे ज्या जागेवर आहेत त्या जागेवरील भुईभाडे व मालमत्ता करापोटी (चालू मागणी व थकबाकी) रु.७१,३७,७२,९१२ व दंडनीय व्याजापोटी रू.२१३,६६,९९,४०० अशी एकूण रु.२८५,०४,७२,३१२ इतक्या रकमेच्या वसुलीकरीता दिनांक १५.०६.२०१८ रोजी देण्यात आलेल्या देयक क्र.००१ ते ००४ द्वारे मे.टोरेन्ट पॉवर कंपनी यांना उक्त रक्कम जमा करण्यास दिलेले आदेश तसेच महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची-ड, प्रकरण-८, कराधान नियम ४२ च्या तरतुदीनुसार जंगम/स्थावर मालमत्तेची अटकावणी करून जप्तीची कारवाई करणे संदर्भात दिनांक ३०.०८.२०१८ रोजी मे.टोरेन्ट पॉवर कंपनी यांचे विरुध्द बजावलेले आदेश अंतिमत: व्यापक लोकहिताविरुध्द असल्याचे निदर्शनास आल्याने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१(१) अन्वये शासनास प्राप्त अधिकारात दिनांक १५.०६.२०१८ रोजी देयक क्र.००१ ते ००४ द्वारे देण्यात आलेले वसुली आदेश व दिनांक ३०.०८.२०१८ रोजी मे.टोरेन्ट पॉवर कंपनी यांचे विरुध्द बजावलेले जंगम/स्थावर मालमत्तेची अटकावणी संदर्भातील आदेश याद्वारे निलंबित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१(२) अन्वये या निलंबन निर्णया संदर्भात सबंधितांना अभिवेदन करावयाचे असल्यास त्यांना निलंबन आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत शासनास अभिवेदन करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१९०२१२१२५२०२६७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Ajit Malhari
Kawade

Digitally signed by Ajit Malhari Kawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=597d3c4c02c1add96119d79fc4b21063ef289863535a77211cf42daa12e539dd, cn=Ajit Malhari Kawade
Date: 2019.02.12 12:53:42 +05'30'

**(अजित म.कवडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
(२) मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
(३) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
(४) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
(५) प्रधान सचिव (ऊर्जा), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
(६) आयुक्त, भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिका, जि.ठाणे
(७) उप सचिव (श्री.जाधव), नगर विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
(८) महापालिका सचिव, भिवंडी-निजामपूर शहर महानगपालिका, जि.ठाणे
(९) निवड नस्ती (नवि-२३), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई